महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळास सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षाच्या योजनेतर तरतुदीतून व्यवस्थापकीय अनुदानाची **दुसरा हप्त्याची** रक्कम मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क.आविम-२०१०/प्र.क्र.६९/का-३

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ५ ऑक्टोबर, २०१०.

**<u>वाचा</u> :-** (१) शासन निर्णय, समाजकल्याण व क्रिडा विभाग क्र. टिडीसी - १०७७ / १३७३३/ डी-२५ (२), दिनांक ६ फेब्रूवारी, १९८२.

(२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक- खर्चनि १०.०७/प्र. क्र १/अर्थोपाय, दिनांक २० एप्रिल, २००६.

(३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.बीयुडी-२०१०/ प्र.क्र.१/ का.६, दिनांक १९ एप्रिल, २०१०.

(४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.आविम-२०१०/ प्र.क्र.६९/ का.३, दिनांक ८ जून, २०१०.

(५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक, यांचे पत्र क्रमांक आविम /लेखा-३/३१/अंप/२३२१/२०१०, दिनांक- ३/९/२०१०.

**प्रस्तावना :-** सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षात महाराष्ट्र राज्य, सहकारी आदिवासी विकास महामंडळास व्यवस्थापकीय अनुदान देण्यासाठी एकूण रु. ३८३१.०७ लक्ष एवढी योजनेतर तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, दिनांक १९ एप्रिल, २०१० अन्वये सन २०१०-११ करिता योजनेतर वेतनासाठी रु. ३५७३.०८ लक्ष व वेतनेत्तर खर्चासाठी रु. २५७.९९ लक्ष असे एकूण रु.३८३१.०७ लक्ष इतक्या तरतूदीचे महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक यांच्या व्यवस्थापकीय अनुदानासाठी वितरण करण्यात आलेले आहेत. सदर तरतुदीमधून पहिल्या हप्त्यापोटी महामंडळास व्यवस्थापकीय अनुदान म्हणून एकूण रू. १२७७.०० लक्ष एवढा निधी संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये वितरीत व खर्च करण्यास मान्यता दिलेली आहे. आता सदर शिल्लक तरतूदीतून व्यवस्थापकीय अनुदानासाठी एकूण रू. १२७७.०० लक्ष एवढा निधी दुसरा हप्ता म्हणून वितरित करण्याबाबतचा प्रस्ताव महामंडळाने सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-** वित्त विभागाच्या वरील क्रमांक २ येथील दिनांक २० एप्रिल २००६ च्या शासन निर्णय/परिपत्रकाच्या अधिन राहून व्यवस्थापकीय अनुदानाचा **दुसरा हप्त्यापोटी वेतनेत्तरसाठी रू. ८६.०० लक्ष व वेतनासाठी रू. ११९१.०० लक्ष असा एकूण रु. १२७७.०० लक्ष (अक्षरी रू.बारा कोटी सत्त्याहत्तर लक्ष फक्त) एवढी तरतुद** संगणक प्रणालीव्दारे वितरीत करुन ती खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मंजुरी देत आहे.

२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी उपरोक्त **१२७७.०० लक्ष (अक्षरी रू. बारा कोटी सत्त्याहत्तर लक्ष फक्त)** कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, मर्यादित नाशिक यांना अदा करावी.

३. सदर खर्च " मागणी क्रमांक: टी - २, २४२५ - सहकार- १०८ - इतर सहकारी संस्थांना सहाय्य- (००) (०१) महाराष्ट्र राज्य सहकारी जनजाती विकास महामंडळाला वित्तीय सहाय्य - ३१-३५ अर्थसहाय्य (२४२५ ०७०१ ) (दत्तमत)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०१०-२०११ मध्ये केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या ,शासन परिपत्रक क्रमांक- खर्चनि-१०.०७/ प्र.क्र.१४/ अर्थोपाय दिनांक २ जुन २००७ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१०१००५१८०५२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सो. ना.बागुल )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य, सहकारी आदिवासी विकास महामंडळ,मर्या. नाशिक.
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र.१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
वित्त विभाग,(अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई .३२.
संचालक, लेखापरिक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक अॅन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.
क.अ. (का-६ व ७) , (का.१) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.३)आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.